**प्रशासकीय मान्यता**
सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड व गोकुलदास तेजपाल रुग्णालय, मुंबई या संस्थेस मंजूर अनुदानातून व्हर्च्युअल ब्राँकोस्कोपी नेव्हीगेशन सिस्टीम हे यंत्र खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : जीटीएच-२०१८/प्र.क्र. ४२१/प्रशा-१**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : ०७ जानेवारी, २०१९.

**वाचा :**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.

४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर जिल्हा यांचे पत्र क्रमांक जिनिसमुंश /जिवायो /मंनि /सर्वसायो /२०१८-१९/ ७२३, दिनांक २०.०४.२०१८

५) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/यंसाख/ रा.शा.२५ टक्के/एकलस्त्रोत/४-म/९५१०/२०१८, दिनांक : ११.०९.२०१८

६) संचालक वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन याचे पत्र क्रमांक संवैशिवसं/यंसाख/ गोतेरू/ब्रॉकोस्कोपीपीएकलस्त्रोत/४- म/ १२०८१ /२०१८, दिनांक १३.११.२०१८

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड व गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई या संस्थांना अनुक्रमे राज्य शासनाच्या २५ टक्के हिश्यांतर्गत व जिल्हा वार्षिक योजनेतंर्गत उपलब्ध निधीतून खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार व्हर्च्युअल ब्राँकोस्कोपी नेव्हीगेशन सिस्टीम ही एकलस्त्रोत (प्रोपरायटरी) स्वरुपाची यंत्रसामुग्री प्रतिसंस्था एक नग उपलब्ध अनुदानातून रुपये १,०६,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सहा लक्ष

फक्त) इतक्या किंमतीस खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रत्येकी किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | व्हर्च्युअल ब्राँकोस्कोपी नेव्हीगेशन सिस्टीम | ०२ | १,०६,००,००० | २, १२, ००,००० | २,१२,००,००० |
| | **एकूण** | | | **२, १२, ००,०००** | **२, १२, ००,०००** |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता संबंधित संस्थांकडे सदर यंत्रसामुग्री खरेदीसाठी उपलब्ध / मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर यंत्रसामुग्री ही एकलस्त्रोत स्वरूपाची असल्याची खातरजमा संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन , मुंबई व संबंधित संस्थेतील सक्षम अधिकारी यांनी केलेली आहे.

३) सदर यंत्रसामुग्री एकलस्त्रोत (प्रोप्रायटरी) स्वरुपाचे आहे, असे संबंधितांनी प्रमाणित केलेले आहे, सबब सदर यंत्रसामुग्री एकलस्त्रोत (प्रोपायटरी) स्वरूपाची आहे किंवा कसे ही बाब तसेच याबाबतचे अद्यावत व विहीत प्रमाणपत्र तपासून हाफकीन महामंडळाने सदर यंत्रसामुग्री खरेदी करणेबाबत कार्यवही करावी

४) मुख्य यंत्र व त्याचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

५) संचालनालयाने व संबधित संस्थेने केल्यानुसार सदर यंत्र हे एकल स्त्रोत (प्रोप्रायटरी) स्वरुपाची आहे. सबब उपरोक्त नमूद नुसार अनुषांगिक बाबी तपासनून , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये परिच्छेद क्र. ३.२.६ मधील कार्यपध्दती व तरतूदींनुसार कार्यवाही करावी.

६) सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

७) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८) सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणतेही नवीन बांधकाम किंवा पदनिर्मीतीची आवश्यकता नाही.

९) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा खर्च संबंधित संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात खालील लेखाशिर्षातंर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा-

डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड
मागणी क्रमांक एस-४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा |
| (००) | - | राज्य योजनांतर्गत योजना |
| (००) (३९) | - | राज्य शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पदव्युत्तर पाठयक्रम सुरु करणे व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (४२१० २१२४) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधन सामुग्री |

गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई
लेखाशिर्ष मागणी क्रमांक ओ-१५

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण |
| १०५ | - | विषम चिकित्सा |
| (३१) | - | जिल्हा वार्षिक योजना |
| (३१) (०१ ) | - | रुग्णालयासाठी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

(४२१० १२७१)

५२ - यंत्रसामुग्री व साधन सामुग्री

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०७१४४५५१५५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2019.01.07 15:33:59 +05'30'

(अ. मु. डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर जिल्हा
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नांदेड.
६. अधिष्ठाता, ज.जी. समूह रुग्णालये, मुंबई
७. अधिक्षक, गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
९. लेखा अधिदान कार्यालय, मुंबई
१०. निवासी लेखाधिकारी, मुंबई
११. निवडनस्ती (प्रशा-१).